# महाराष्ट्र शासन
## सामान्य प्रशासन विभाग
## शासन आदेश क्रमांकः संकिर्ण-२०१४/४८८/प्र.क्र.१४३/३४-अ,

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
तारीख: ९ सप्टेंबर, २०१४.

**वाचा :**

**शासन आदेश क्रमांकः** सामान्य प्रशासन विभाग, क्र. मावज २०१३/७१४/ प्र.क्र.२३८/३४-अ, दि.२४ जुलै,२०१४

## आदेश

आगामी विधानसभा निवडणूकांच्या अनुषंगाने निवडणूकीच्या कामाशी प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्षपणे संबंधित असणाऱ्या अधिकाऱ्यांपैकी स्वत:च्या जिल्ह्यात कार्यरत असणाऱ्या अथवा दि.३१.१२.२०१४ पूर्वी एकाच जिल्ह्यात ३ वर्षे पूर्ण करणाऱ्या अथवा मागील ४ वर्षांपैकी ३ वर्षे एकाच जिल्ह्यात असणाऱ्या अधिकाऱ्यांची ते ज्या जिल्ह्यात कार्यरत आहेत तेथून अन्यत्र बदली करण्यात यावी असे निदेश भारत निवडणूक आयोगाने दि.१४.७.२०१४ च्या पत्रान्वये दिले आहेत. सबब, महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील नियम ५ नुसार माहिती व जनसंपर्क महासंचालनालयातील गट-अ व गट-ब संवर्गातील खाली नमूद केलेल्या अधिकाऱ्यांची कामकाजाच्या व प्रशासकीय सोयीच्या दृष्टीने त्यांच्या नावासमोर स्तंभ ४ मध्ये दर्शविलेल्या ठिकाणी बदलीने पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नांव | सध्याचे पद व ठिकाण | बदलीनंतरचे पद व ठिकाण |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| **वरिष्ठ सहायक संचालक (माहिती)/वरिष्ठ उपसंपादक/जिल्हा माहिती अधिकारी/जनसंपर्क अधिकारी, गट-अ (कनिष्ठ)** | | | |
| १ | श्रीमती व. बा. पाटोळे | जिल्हा माहिती अधिकारी, माहिती केंद्र, कोल्हापूर | विधानसभा निवडणूक २०१४ ची आचारसंहिता संपेपर्यंत संदर्भाधीन दि.२४.७.२०१४ च्या आदेशान्वये जिल्हा माहिती अधिकारी, कोल्हापूर या पदावरील पदस्थापनेस तात्पुरती स्थगिती देऊन श्रीमती पाटोळे यांची तात्पुरती पदस्थापना वरिष्ठ सहायक संचालक (माहिती), मुंबई या पदावर करण्यात येत आहे.<br>आचारसंहिता संपुष्टात आल्यावर दि.२४.७.२०१४ च्या आदेशातील श्रीमती पाटोळे यांच्या जिल्हा माहिती अधिकारी, |

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नांव | सध्याचे पद व ठिकाण | बदलीनंतरचे पद व ठिकाण |
|---|---|---|---|
| | | | कोल्हापूर या पदावरील पदस्थापनेस दिलेली तात्पुरती स्थगिती संपुष्टात येईल. त्यानंतर त्यांची पदस्थापना जिल्हा माहिती अधिकारी, कोल्हापूर या पदावर करण्यात येत आहे. |
| **सहायक संचालक (माहिती)/माहिती अधिकारी/अधिपरिक्षक, पुस्तके व प्रकाशने, गट-ब** | | | |
| १ | श्री. मि.म. बांदिवडेकर | सहायक संचालक (माहिती), विभागीय माहिती कार्यालय, कोल्हापूर | माहिती अधिकारी, जिल्हा माहिती कार्यालय, पुणे |

२. वरील अधिकाऱ्यांना बदल्यांच्या पदावर रुजू होण्यासाठी तात्काळ कार्यमुक्त करण्यात यावे. सदर अधिकाऱ्यांनी त्यांच्या नावासमोर स्तंभ ४ मध्ये दर्शविलेल्या पदावर तात्काळ रुजू होऊन आवश्यक अहवाल सर्व संबंधित कार्यालयांस तसेच शासनास विनाविलंब सादर करावा. हे आदेश तात्काळ अंमलात येतील. बदली झालेल्या अधिकाऱ्यांची बदलीनंतरच्या पदस्थापनेत बदल करण्यासंबंधीच्या कोणत्याही विनंतीची दखल घेण्यात येणार नाही व त्या संदर्भात कोणत्याही प्रकारे दबाव आणल्यास संबंधित अधिकाऱ्याविरुध्द महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ अन्वये शिस्तभंगाची कारवाई करण्यात येईल

३. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९०९१८४११२२१०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MUSALE RAMKISAN NARAYANRAO

Digitally signed by MUSALE RAMKISAN NARAYANRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GOVT. OF MAHARASHTRA,CID - 916891, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=eb28cc64e4adc3dd948671d0896f641e3e54c25e6deb33a784d0a3d037ae7ff8, cn=MUSALE RAMKISAN NARAYANRAO
Date: 2014.09.09 18:36:02 +05'30'

**(रा. ना. मुसळे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई,
२. मा.राज्यमंत्री (मा.व ज.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. सचिव (मावज), यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
४. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई,

५. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२(लेखा व परिक्षा), मुंबई,
६. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
७. संचालक (माहिती)(प्रशासन), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
८. संचालक (माहिती)(वृत्त व जनसंपर्क), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
९. सर्व विभागीय उपसंचालक (माहिती),
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
११. निवासी लेखा अधिकारी, मुंबई,
१२. जिल्हा माहिती अधिकारी, कोल्हापूर, पुणे,
१३. जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर, पुणे,
१४. उपसंचालक (लेखा), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
१५. संबंधित अधिकारी, (मावज मार्फत),
१६. सामान्य प्रशासन विभाग /का.१२, ३४, २१,
१७. निवड नस्ती (का.३४-अ)